201103191116250001 पुणे महानगरपालिका

सन १९९३-९४ मध्ये समारंभाप्रित्यर्थ झालेल्या खर्चास कार्योत्तर मंजूरी...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:पीएमसी-३०९४/११९२/प्र.क्र.२२१/९४/नवि-२२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक: २८ सप्टेंबर, १९९४.

वाचा:- १] शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र.जीईएन-१०८७/२७८/ सीआर-३०, नवि-२१, दिनांक २६ जून, १९८७.

२] आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे क्र.म.आ/न.स./५०३, दिनांक ५.८.९४ चे पत्र.

प्रस्तावना:- महाराष्ट्र शासनाचे अधिसूचना क्रमांक जीईएन-१०८७/२७८/सीआर-३०/नवि-२१, दिनांक २६ जून, १९८७ नुसार महानगरपालिकांनी समारंभाप्रित्यर्थ दरवर्षी १ लाखपेक्षा जास्त खर्च करु नये असे बंधन घातलेले आहे. सन १९९३-९४ या वर्षामध्ये पुणे महापालिकेने अशा समारंभाप्रित्यर्थ रु.३,४६,९००/-एवढा खर्च केला आहे. या मर्यादेबाहेर केलेल्या खर्चास मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

निर्णय:- उपरोक्त शासन अधिसूचनेतीलसार्वजनिक समारंभाप्रित्यर्थ करावयाच्या खर्चाची मर्यादा ओलांडून, पुणे महानगरपालिकेने १९९३-९४ मध्ये रु.२,४६,९००/- [रुपये दोन लाख सेहेचाळीस हजार नउशे फक्त] केलेल्या अतिरिक्त खर्चास, खास बाब म्हणून शासन कार्योत्तर मंजूरी देत आहे.

२. पुणे महानगरपालिकेला पुढे असेही आदेश देण्यात येत आहेत की, उपरोक्त शासन अधिसूचनेतील खर्चाची मर्यादा भविष्यात ओलांडली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ तु. कृ. पाटील ]
कार्यासन अधिकारी.

प्रति,

आयुक्त,
पुणे महानगरपालिका, पुणे [तीन प्रतीत]

प्रत, माहितीसाठी:
लेखापरीक्षा अधिकारी, नगर विकास विभाग, नवि-२४, नवि-२५
निवडनस्ती-नवि-२२.